**अण्णासाहेब पाटील आर्थिक मागास विकास महामंडळ मर्या.,मुंबई यांच्या अंशदान भाग भांडवलात वाढ करण्याबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**कौशल्य विकास व उदयोजकता विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः अपाम २०१६/प्र.क्र.१८७/रोस्वरो-१**
२ रा मजला, मंत्रालय, मादाम कामा मार्ग
हुतात्मा चौक, मुंबई-४०० ०३२
तारीख: ३१ मार्च, २०१७

वाचा -

१) **शासन निर्णय क्रमांकः रोजगार व स्वयंरोजगार विभाग क्र.अमामं-१९९८/प्र.क्र.३६३/रोस्वरो-१ दि.२७ नोव्हेंबर,१९९८**

प्रस्तावना -

राज्यातील आर्थिकदृष्टया मागास घटकातील उदयोजक बनू इच्छिणा-या व तशी क्षमता असलेल्या तरुण वर्गाला आर्थिक सहाय्य पुरविण्याच्या दृष्टीने दिनांक २७ नोव्हेंबर,१९९८ पासून राज्यात अण्णासाहेब पाटील आर्थिक मागास विकास महामंडळ कार्यरत आहे. या महामंडळामार्फत आर्थिक दृष्टया मागास घटकातील उमेदवारांना स्वयंरोजगार तथा उदयोग उभारणी करीता बीज भांडवल व खेळते भांडवल तसेच थेट कर्ज पूरविण्याबाबत योजना राबविण्यात येतात. या महामंडळास शासनाकडून आतापर्यन्त रु.५० कोटी इतके भागभांडवल मंजूर करण्यात आलेले आहे. तथापि, आता महामंडळाद्वारे राबविण्यात येणा-या योजनांना गती मिळण्यासाठी रु.२०० कोटी इतके अनुदान अंशदान भागभांडवल म्हणून उपलब्ध करुन देण्यासाठी सन २०१६-२०१७ च्या हिवाळी अधिवेशनामध्ये पुरवणी मागणीचा प्रस्ताव मा.मंत्रीमंडळाच्या मान्यतेच्या अधिन राहून मंजूर करण्यात आला. सदर प्रस्तावास मा.मंत्रीमंडळाची मान्यता घेण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. सदर प्रस्तावाच्या अनुषंगाने मा.मंत्रीमंडळाने दि.३०/०३/२०१७ रोजी पार पडलेल्या मा.मंत्रीमंडळाच्या बैठकीमध्ये अण्णासाहेब पाटील आर्थिक मागास विकास महामंडळाचे सध्याचे अंशदान भागभांडवल सन २०१६-२०१७ च्या हिवाळी अधिवेशनात पुरवणी मागणीद्वारे मंजूर केल्याप्रमाणे रु.२०० कोटी इतके तसेच सन २०१७-२०१८ च्या अर्थसंकल्पीय अधिवेशनात मंजूर केल्याप्रमाणे रु.२०० कोटी इतके, असे एकूण रु.४०० कोटीने वाढविण्याचा निर्णय घेण्यात आला आहे.

**शासन निर्णय-**

मा.मंत्रीमंडळाने घेतलेल्या निर्णयानुसार अण्णासाहेब पाटील आर्थिक मागास विकास महामंडळ मर्या. मुंबई यांच्या योजना अधिक प्रभावीपणे राबविण्यासाठी महामंडळाचे सध्याचे अंशदान भागभांडवल रु.४०० कोटीने वाढविण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

२. महामंडळास मंजूर केलेल्या एकूण रु.४०० कोटी इतक्या अंशदान भागभांडवलापैकी सन २०१६-२०१७ च्या हिवाळी अधिवेशनात पुरवणी मागणीद्वारे मंजूर केलेले रु.२०० कोटी इतके अंशदान भाग भांडवल सन २०१६-२०१७ या आर्थिक वर्षाकरिता पुढील नमूद लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात येत आहे. मागणी क्र.- झेडए-४, ४२५०, इतर सामाजिक सेवावरील भांडवली खर्च (०० १९०), सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणुका, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना, राज्य योजनांतर्गत योजना (००) रोजगार, (००)(०१)अण्णासाहेब पाटील आर्थिक मागास विकास महामंडळाला भांडवली अंशदान (४२५० ०२५९), ३२ अंशदाने

३. उपरोक्त मंजूर केलेले शासनाचे भाग भांडवल अण्णासाहेब पाटील आर्थिक मागास विकास महामंडळ मर्या., मुंबई यांना प्रदान करण्यासाठी श्री.वि.रा.वंजारी,आहरण व संवितरण अधिकारी, कौशल्य विकास व उद्योजकता विभाग यांना तसेच श्री.ब.शे.मांडवे, नियंत्रक अधिकारी, कौशल्य विकास व उद्योजकता विभाग यांना प्राधिकृत करण्यात येत असून त्यांनी याबाबतच्या देयकावर स्वाक्षरी करण्यासाठी शासन मंजूरी देत आहे. सदर रक्कम एकरक्कमी पध्दतीने महामंडळास अदा करण्यात यावी.

४.सदरचा शासन निर्णय , नियोजन विभागाच्या अनौ.सं.क्र.७०/१४७१ दि.०८.०३.२०१७ व वित्त विभागाच्या अनौ.सं.क्र.१०६३/व्यय-६ दि.१४.०३.२०१७ अन्वये मिळालेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०३३११६३९५५८००३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Deepak Kapoor

Digitally signed by Deepak Kapoor
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Skill Development And Entrepreneurship Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=77264682cc644c05342101aef6b88a890139be511406216a87cece88011976db, serialNumber=f1059fb866e1d4df117417230d0bd657bacef96c653c7c0f49986de4c1cbf1c4, cn=Deepak Kapoor
Date: 2017.03.31 16:44:45 +05'30'

**(दीपक कपूर)**
शासनाचे प्रधान सचिव

**प्रत,**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
३. मा.मंत्री, कौशल्य विकास व उद्योजकता यांचे खाजगी सचिव
४. मा.राज्यमंत्री, कौशल्य विकास व उद्योजकता यांचे खाजगी सचिव
५. मा.मुख्य सचिव ,महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
६. अपर मुख्य सचिव , नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
७. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
८. आयुक्त, कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता संचालनालय, कोकणभवन,नवी मुंबई
९. महालेखाकार ,महाराष्ट्र -१/२, मुंबई/ नागपूर
१०.व्यवस्थापकीय संचालक, अण्णासाहेब पाटील आर्थिक मागास विकास महामंडळ मर्या, मुंबई-०१
११.अधिदान व लेखाअधिकारी, मुंबई
१२.निवासी लेखा अधिकारी, मुंबई
१३. उप सचिव (रोस्वरो-२ कार्यासन ), कौशल्य विकास व उद्योजकता विभाग, मंत्रालय, मुंबई
१४.नियंत्रक अधिकारी, कौशल्य विकास व उद्योजकता विभाग, मंत्रालय, मुंबई
१५.आहरण व संवितरण अधिकारी, कौशल्य विकास व उद्योजकता विभाग, मंत्रालय, मुंबई
१६.निवड नस्ती- रोस्वरो-१